**भारतातील दारिद्र्य व बेकारी**

**वसंत पळशीकर**

भारताची गरिबी आपणा सर्वांना अतिपरिचित आहे. साहजिकच, ती सम्यक् - परिचित नसावी हेही ओघानेच आले. 'अति परिचयात् अवज्ञा' हा न्यायच आहे. या गरिबीने आपले चित्र विचलित व्हायचे कधीचेच बंद झाले आहे, इतकी ती रोजची व न संपणारी गोष्ट झालेली आहे. या विषयास सरळ सरळ, तेच नाव देऊन हात घालण्याचे धाडस प्रा. वि. म. दांडेकर आणि डॉ. नीळकंठ रथ यांनी केले आहे. विद्वानांच्या सुरक्षित, आरामशीर व उंच मनोऱ्यातून खाली येऊन रस्त्यावरील गर्दीत मिसळण्यासारखे आहे हे.

आकडेमोडीत तरबेज असलेल्या या उभयतांनी बरीच आकडेमोड करून भारतातील किती लोक किती गरीब आहेत, गेल्या दहा वर्षांत त्यांच्या परिस्थितीत किती फरक पडलाय आणि पुढच्या पंधरा वीस वर्षांत काय होण्याची शक्यता आहे याचे दिग्दर्शन केले आहे. हातच्या कांकणालाही हल्लीच्या काळात आरशात पाहावे लागते, त्यादृष्टीने ही आकडेमोड ठीक आहे. पण या आकडेमोडीबद्दलही मनात काही शंका उपस्थित होतात. एकीकडे अपार दारिद्र्य आणि दुसरीकडे आकाश ठेंगणं वाटावं इतकी धनाची राशी ही दोन टोकं. आता, त्यात लोकसंख्येची वाटणी कशी झालीय असा प्रश्न केला तर ती खूप असमान आहे असे सामान्य निरीक्षणाच्या आधारे उत्तर मिळते. ज्यांना इकडून-तिकडून गोळा करून, भीक मागून, चोरून मारून हातातोंडाची मिळवणी करावी लागते असाही एक मोठा गट आपल्याकडे आहे. ही माणसे परिश्रम करीत नाहीत असे नाही. अशा पद्धतीने सर्वस्वी किंवा अंशत: दुसऱ्यांच्यावर जगण्यासाठी त्यांना पुष्कळच परिश्रम पडतात. पण इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ पोलिटिकल उत्पन्नावर जगतात अशांची कोटी वेगळीच वाटावी, ते एका निराळ्याच विश्वाचे नागरिक वाटावेत, इतका ह्या सगळ्यांच्या जीवनाचा घाट वेगळा आहे. मोलमजुरी, बलुतेदारी सेवा, शेती वा व्यवसायापासूनचे उत्पन्न, नोकरी चाकरीपासूनचे उत्पन्न यावर केवळ ज्यांची गुजराण होऊ शकते, मग त्यापैकी काहींचे जीवन कितीही निकृष्ट दर्जाचे का असेना, अशांची गणना भारतात विशेषाधिकारसंपन्न गटात व्हावी इतका हा पहिला गट मोठा आहे.

तळाशी दारिद्र्य इतके अपार असताना आणि तळाशी इतक्या प्रमाणात माणसे असताना मासिक वा वार्षिक सरासरी खर्चाच्या आकडेवारीने लोकसंख्येची विभागणी करणे फारसे अर्थपूर्ण ठरत नाही. तळच्या दहा टक्के लोकांचा विचार दांडेकर - रथ यांनीही, नियोजन मंडळाचे अनुकरण करून, वगळलाच आहे ही गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे. ग्रामीण भागातील १०% म्हणजे (दांडेकर - रथ यांच्या अंदाजाप्रमाणे) १९६९ साली, सुमारे ४.३ कोटी लोक होतात. याचाच अर्थ असा की किमान या चारसाडेचार कोट लोकांबद्दल वार्षिक सरासरीच्या भाषेत बोलणे ही त्यांची केवळ थट्टा होय. तो केवळ एक मनोरंजक खेळ ठरतो. आणि, शेवटी, जेव्हा आकडे त्यांच्या सामान्य डोळस निरीक्षणावर आधारलेल्या अंदाजांच्या विरोधी जातात, तेव्हा ते आकडे चूक ठरवायला त्यांना वेळ लागत नाही.

भारताच्या आजच्या परिस्थितीत आकडेवारीच्या अचूकतेच्या मागे लागण्याची गरजही नाही असे मला वाटते. प्रश्नांचे

ढोबळ आकारमानच एवढे मोठे आहे की प्रत्यक्ष कार्यक्रम हाती घेण्याच्या दृष्टीने त्याची गरजही नाही. गरीबी दूर करण्यासाठी कार्यक्रम हाती घेण्याच्या दृष्टीने जास्त गरज कशाची होती? तर, या देशातील गरीब व बेकार - अर्धबेकार लोकांच्यात त्यांच्या त्यांच्या वैचित्र्यपूर्ण परिस्थितीनुसार पडणारे वेगवेगळे गट कोणते, त्यांच्या परिस्थितीची वैशिष्ट्ये कोणती आणि त्या त्या गटात ज्यांचा समावेश करावा लागेल अशांची संख्या स्थूलमानाने किती, या गोष्टींची स्पष्टता होण्याची गरज आहे. अशा परिस्थितीच्या दृष्टीने एकजिनसी असलेल्या गटातील कुटुंबांचे उत्पन्न किती असते, ते कशाकशाचे मिळून बनलेले असते याचीही माहिती असणे आवश्यक आहे. कुटुंब जितके गरीब तितकी त्या कुटुंबातील लहान मुलेही विविध प्रकारे कुटुंबाच्या उत्पन्न हस्तगत करण्याच्या प्रयत्नात सहभागी होत असतात. आणि एकूण कुटुंबाच्या उत्पन्नाचे घटक, कुटूंबाला उपलब्ध असलेली रोजगारी इ. माहिती विशेष महत्त्वाची आहे.कॅलरीच्या परिमाणात पुरेसा आहार मिळण्यासाठी उपभोग्यवस्तूंवरील दरडोई खर्चाचे मान किमान किती असावयास पाहिजे त्याची एक पातळी ठरवून, त्या खाली असणारे ग्रामीण भागातील लोक कोण याविषयी दांडेकर - रथ म्हणतातः 'या काहीशा जुन्या झालेल्या आणि अधुऱ्या, फुटकळ माहितीवरूनही ही गोष्ट स्पष्ट होते की, शेतीवर मजुरी करणारी कुटुंबे आणि ५.० एकराखाली आणि विशेषतः २.५ एकराखाली कसणूकक्षेत्र असलेले जमीनधारक यांचाच प्रामुख्याने ग्रामीण भागातील गरीबांमध्ये समावेश होतो. आपल्या पारंपरिक व्यवसायांमधून उत्तरोत्तर अधिकाधिक प्रमाणात (ते व्यवसाय आकुंचन पावत चालल्याने) हकालपट्टी होत असलेल्या ग्रामीण कारागिरांचाही या दोन गटांमध्ये आणखी समावेश करायला हवा, (पृ. १७).[*] एकंदर ग्रामीण लोकसंख्येच्या ४० टक्के लोक १९६८-६९ साली किमान जीवनमानाच्या रेषेखाली रहात होते असा अंदाज ते व्यक्त करतात. या ४० टक्के लोकांमध्ये पडणारे विविध गट-उपगट, त्यांचे स्थूल आकारमान, त्यांच्या परिस्थितीची वैशिष्ट्ये व भिन्नता, दारिद्र्य व बेकारी यांच्या समस्येचे गटानुसार-उपगटानुसार वेगळेपण याविषयी वस्तुतः त्यांनी स्पष्टता करावयास हवी होती.

** शहरातील गरीब हे ग्रामीण भागातून आलेल्या लोंढ्यासारखे आहेत, व ग्रामीण दारिद्र्य व बेकारीवर प्रभावी उपाययोजना केली तर शहरी दारिद्र्य व बेकारी यांचे निवारण त्यातून काहीसे आपोआप होईल, अशी भूमिका दांडेकर - रथ यांनी घेतली आहे. ही भूमिका पटण्यासारखी नाही, कारण शहरातील गरीबांची संख्या आज स्वतंत्रपणे खूप मोठी आहे. भूमिका सोयीची आहे, कारण तेवढेच उपाययोजनेचे आकारमान कमी होते, त्यातली गुंतागुंत कमी होते, इ. असो. ग्रामीण भागातील गरीबांना डोळ्यांपुढे ठेवून प्रस्तुत लेखात चर्चा केली आहे, कारण दांडेकर - रथ यांच्या विवेचनाच्या संदर्भात नेमकेपणा येण्याच्या दृष्टीने ते सोयीचे आहे.*

सर्व गरीबांची गरिबी व बेकारांची बेकारी एकाच ढोबळ उपाययोजनेने सुटणारी नाही ही साध्या शहाणपणाची गोष्ट विसरावयास होते. आकडेमोडीत प्रवीण असण्याचा हा अपरिहार्य परिणाम आहे असे खचितच नाही. पण प्रस्तुत पुस्तक वाचत असताना आकडेमोडीच्या आतषबाजीत लेखकद्वय फाजील जास्त रमलेले आहेत असे वाटते हे मात्र खरे.

दारिद्र्य व बैकारी निवारण्यासाठी आज जे मार्ग सुचविले जातात त्यापैकी दोन मार्गांची चिकित्सा दांडेकर - रथ यांनी केली आहे. जमीन फेरवाटप आणि श्रमसघन उत्पादनतंत्रांचा स्वीकार हे ते दोन मार्ग होते. हे दोन्ही मार्ग स्वीकारणीय नाहीत असा निष्कर्ष त्यांनी काढला आहे. या भागातले त्यांचे विवेचन त्यांच्या वादविवादपटुत्वाची खात्री पटवून देते

पण येथेही वादात हरविण्याच्या नादात आपल्या विवेचनाला आलेले अतिरेकी एकेरीपण त्यांच्या नजरेतून सुटले आहे.

शेतजमिनीच्या मालकीचे फेरवाटप व्हावे असे म्हटले जाते तेव्हा अशा फेरवाटपाने गरीबी दूर होईल किंवा सर्वांना वेळ रोजगार मिळेल असेच प्रतिपादन फक्त त्यामागे असते असा सोयीस्कर समज लेखकांनी करून घेतला आहे. आपल्या प्रतिपक्षाची भूमिका आपल्या सोयीनुसार एकांगी व दुबळी करून मांडणे नेहमीच शक्य असते. आपल्या हातून ते होऊ नये याची विशेष दक्षता बाळगण्याची आवश्यकता या प्रसंगी होती.

शेतजमिनीच्या मालकीचे चित्र काय आहे? जमिनीची मालकी अत्यंत विषम प्रकारे झालेली आहे हे सर्वांना माहीत आहे. आता, जे बडे शेतमालक आहेत त्यांच्या शेतीबद्दल आपणास काय म्हणता येते याचा विचार करू. आपल्या शेतीचे सक्रियपणे तांत्रिकदृष्ट्या व्यवस्थापन करीत आहेत असे कितींबद्दल म्हणता येईल? यापैकी कितींची शेती, दर एकरी उच्च उत्पादन देते या अर्थाने, कार्यक्षम व आधुनिक आहे? यांच्याजवळ असलेल्या शेतीपैकी किती भाग हे सघन, कार्यक्षम पद्धतीने करतात? केवळ मालक असल्याच्या कारणाने उत्पन्नातील हिस्सा मिळतो अशी यापैकी शेती किती? खेडेगावातून राहिल्यास मनावर कोणता ठसा उमटतो ? तंत्रज्ञान, व्यवस्थापनकौशल्य, इ. प्रकारची बौद्धिक स्वरूपाची वा भांड वलासारखी अन्य उत्पादनसाधने बडे शेतकरी गुंतवीत आहेत आणि त्याचे फळच तेवढे ते उपभोगीत आहेत असा ठसा उमटत नाही. ज्या शेतीबद्दल असे म्हणता येईल त्या शेतीतही, श्रम गुंतविणाऱ्या माणसांना योग्य ते दिल्यानंतर, आपण गुंतविलेल्या घटकांना योग्य मोबदला जमीनधारक घेत आहेत असे चित्र दिसत नाही. मालकीचा फायदा घेऊन, बडे शेतकरी प्रत्यक्ष कसणाऱ्यांच्या जिवावर आपली उपजीविका बऱ्याच प्रमाणात विनासायास हस्तगत करीत आहेत असे एकंदर चित्र आहे.

दुसऱ्या एका अंगानेही पाहता येईल. शेतीशी संबंध नसलेले भुकेकंगाल व बेकार लोक गावांतून शेतीची मागणी करीत आहेत असे नाही. ज्यांच्यात जमिनीचे वाटप व्हावे अशी मागणी आहे ते लोक आज काय करीत आहेत? ते त्याच जमिनीवर काम करीत आहेत, पण त्या जमिनीतून निघणाऱ्या फळापासून ते मोठ्या प्रमाणावर वंचित राखले जातात. शेवटी, देशात अमूक इतके उत्पादन शेतीतून होते ते कोणाच्या कष्टांमुळे? भांडवल, यंत्रज्ञान, व्यवस्थापनकौशल्य इ. उत्पादनघटकांचा त्यातला हिस्सा काढल्यावर बाकीचा जो भाग उरतो त्यातून सरकारचा करभार व पुढील विकासाच्या दृष्टीने आवश्यक त्या भांडवलसंचयाचा भाग वजा केल्यावर जे उरते ते, उत्पादन ज्यांच्या कष्टांमुळे होते त्यांना उपभोगण्यास मिळते का? ते जर त्यांना मिळत नसेल तर ते त्यांना मिळण्यासाठी काय केले पाहिजे? असाही विचार करता येण्यासारखा आहे.

जमीन फेरवाटप व्हायला हवे ते दोन कारणांसाठी. एक, केवळ मालकीमुळे उत्पन्नातला मोठा भाग आपल्याकडे वळवून घेणारी बांडगुळे दूर व्हावीत म्हणून. आणि आर्थिक विषमता कमी करण्यासाठी. भारतात असलेली जमीन सर्व ग्रामीण कुटुंबांत वाटून दिल्यास ती सर्वांना इतकी थोडी थोडी मिळेल की त्यातून दारिद्र्य हटणार नाही की बेकारी निवारणही होणार नाही हे प्रतिपादन बिनतोड असले तरी उथळ व मुद्द्याला सोडून आहे. कारण, केले तर, प्रत्येकाला

जमीनवाटप किंवा मग अनिर्बंध खुली व्यवस्था अशा टोकाच्या भूमिका सोडून विचार करणे शक्य आहे. मालकीची जमीन कुटुंबाजवळ किती असावी यावर मर्यादा असावी असे दांडेकर-रथही म्हणतात. अर्थ असा की, कर्तृत्व वा अन्य प्रकारची अनुकूलता आहे म्हणून कोणालाही हवे तेवढे सधन होण्याची मुभा देण्यास ते तयार नाहीत. मग प्रश्न उरतो तो हा की, एका माणसास शेतीतून जास्तीतजास्त किती मिळकत होणे आपण रास्त मानतो? सुधारित पद्धतींनुसार कार्यक्षमरीत्या शेती केल्यास जास्तीत जास्त तितके उत्पन्न मिळू शकेल असे धारणक्षेत्र देशाच्या वेगवेगळ्या भागात जे येईल ते, आणि आज सीलिंग कायद्यानुसार जे बाळगता येते ते, यात तफावत आहे काय, असल्यास किती, या कसोटीनुसार कुटुंबावर मर्यादा घातल्यास किती जमीन उपलब्ध होऊ शकेल, त्यातून किती कुटुंबांना जमीन देता येईल, त्याची काय पद्धती बसविता येईल याचे विवेचन त्यांच्याकडून अपेक्षित होते. शक्य आहे की या मार्गाने एकंदर काही लाख कुटुंबांचीच सोय झाली असती. पण त्या कुटुंबांची सोय होणे ही गोष्ट दारिद्र्य व बेकारी निवारण्याच्या दृष्टीने कमी महत्त्वाची नाही. हे एक. दुसरे, आजही बांडगुळासारखे जे जमीनमालक गावोगाव आहेत (किंवा आपल्या मालकीच्या जमिनीपैकी काही जमिनीबाबत त्यांचे संबंध तसे आहेत) ते दूर करण्याची आवश्यकता त्यांनी प्रतिपादन करणे उचित झाले असते. तसेच, सार्वजनिक खर्चाने धरणे बांधली जातात; भांडवलपुरवठा सहकारी यंत्रणेमार्फत होतो; नवी बियाणी, खते इ. साधने सरकार स्वस्त दराने पुरवते. शेती आज किफायतशीर होण्यात जर समाजाचा मोठा वाटा असेल तर अशा प्रकारे, किमानपक्षी, जिराईत जमीन पाण्याखाली येत असेल तेथे बागाईत जमीनधारणाची मर्यादा कडकपणे अमलात आणून उरलेली जमीन सरकारने सरळ ताब्यात घेऊन तिचे वाटप ज्यांचे पुनर्वसन करावयाचे आहे त्यांच्यात व त्याच भागातील लहान शेतकरी व भूमिहीन यांच्यात करावे हे योग्य होणार नाही का?

किंबहुना, आकडेवारीचा बागुलबोवा उभा न करता या प्रश्नाकडे बघितल्यास तो निष्कारण अधिक जटिल बनत नाही. एक गाव घ्यावे, त्या गावातील जमीन कोणाच्या किती मालकीची आहे हे न पाहता, जमिनीचा कोणचा तुकडा कोण कसत आहे, कोणाच्या जमिनीत कोणाचे किती भांडवल, तंत्र व व्यवस्थापनकौशल्य गुंतले आहे ते पहावे आणि आज वस्तुतः जो जी जमीन कसतो आहे ती त्याच्या मालकीची करून टाकावी. कारण, जेथे विशेष कौशल्याने शेती केली जात आहे असे म्हणता येणार नाही तेथे, आज जो प्रत्यक्ष शेती कसत आहे त्याला तो जी शेती कसत आहे ती, ती पुरेशी आहे की नाही हा विचार तूर्त न करता, देऊन टाकण्याने शेतीउत्पादन आजच्यापेक्षा तर खाली जाण्याचे काही कारण नाही.

दांडेकर - रथ यांच्या पुस्तकात त्यांनी पुष्कळ ठिकाणी तीन प्रश्न विचारले आहेत. (तीनच का?) जमीन वाटप सर्वांना करण्यास पुरेशी इतकी जमीन आहे का हा प्रश्न वरील ठिकाणी गैरलागू ठरतो. राहतात दोन प्रश्न. एक, ज्या समाजात उत्पादन- साधनांची मालकी खाजगी असते त्या अर्थव्यवस्थेत जे आर्थिक शक्ति प्रवाह कार्यकारी असतात त्यांना तोंड देऊन असे वाटप टिकविता येईल काय? हाच प्रश्न सीलिंगच्या शेतांवर कर बसविण्याच्या व शेती व्यवसायात वेतन कायदे लागू करण्याच्या, किंबहुना सर्व प्रकारच्या बंधनांना तेवढाच लागू आहे. तेव्हा, हाही प्रश्न वादविवादपटुत्वाच्या पलीकडे जात नाही. त्यांचा तिसरा प्रश्न असा एक विशिष्ट उपाययोजना केली, ती काही काळ कृत्रिमपणे कायम ठेवली

तर शेतीचा उत्तरोत्तर अधिक विकास होण्यास अनुकूल अशी परिस्थिती निर्माण होईल की शेतीचा विकास अडकून पडेल अशी परिस्थिती निर्माण होईल? आज ज्या कारणांनी शेती किफायतशीर झालेली आहे ती कोणती? पाणीपुरवठा, खते, बी-बियाणे यांना त्याचे मुख्य श्रेय जाते. याच्या जोडीला भांडवल व तंत्र व व्यवस्थापनकौशल्य यांचा उल्लेख करावा लागेल. पण पहिले तीन घटक अस्तित्वात असल्याखेरीज दुसऱ्या दोन घटकांना काही विशेष कामगिरी बजावता येत नाही. आता, शेतांचा आकार मोठा असल्याखेरीज या उच्च उत्पादन देणाऱ्या घटकांचा वापर करता येत नाही असे आहे काय? भांडवलाच्या गुंतवणुकीलाही आकाराची अट नाही. व्यवस्थापनकौशल्याबद्दल असे म्हणता येईल की या क्षेत्रात मोठे कर्तृत्व असणारी माणसे उतरायची असतील तर मोठी शेते मालकीची असणे आवश्यक आहे. पण सीलिंग आपण मान्य करतो तेव्हा याबाबतीत एक मर्यादा आपण स्वीकारतोच. तर मग हा प्रश्न टाकून दांडेकर रथ फेरवाटपाचा उपाय उडवून का लावतात?

भारतात शेती अति-लहान तुकड्यांमध्ये विभागली गेली असल्याने भारतीय शेतीचा विकास अडून राहिलाय या प्रतिपादनाला दांडेकर - रथ मान्यता देतात. एकतर ही गोष्ट फारशी खरी नाही. आज शेती किफायतशीर झाली आहे ती शेते मोठी बनल्याने नव्हे ही गोष्ट दांडेकर - रथच सांगतात. शेते लहान असल्याने शेतीचे यांत्रिकीकरण होऊ शकणार नाही. पण शेतीचे यांत्रिकीकरण झालेच पाहिजे अशी भारतीय शेतीची वा समाजाची वा अर्थव्यवस्थेची नितांत गरज नाही. लहान लहान तुकड्यांमध्ये शेती विभागलेली आहे ही गोष्ट पीकनियोजन व भूसुधारणा या गोष्टींच्या आड येते आहे असे म्हणता येईल. येथे अडथळा होतो तो खाजगी मालकीसंबंधीच्या आपल्या रूढ कल्पनेमुळे. माझ्या शेतात मी मला पाहिजे ते करणार (वा करणार नाही) असे म्हणण्याचा अधिकार हा खाजगी मालकीचाच एक भाग आहे असे मानले जाते ही खरी अडचण आहे. पण ही अडचण सीलिंग मान्य केलेल्या दांडेकर-रथप्रणीत व्यवस्थेतही तेवढीच कायम राहील. याला खरा उपाय खाजगी मालकीच्या कल्पनेतच मूलभूत फेरबदल करणे हा आहे. किंबहुना, जेथे जमीन व माणूस यांचे प्रमाण भारत वा जपान वा चीन या देशांतल्यासारखे आहे, म्हणजे जेथे दरडोई अल्प जमीन उपलब्ध आहे तेथे जमीन ही कोणा व्यक्तीच्या खाजगी मालकीची असू नये, कुटुंबांना जमीन कसणुकीकरता मिळावी, शेतीतल्या काही बाबी या सामाजिक व्यवस्थापनाखाली असाव्यात, इ. अशा प्रकारची, ज्यात खाजगी व सामायिक यांचे मिश्रण असेल अशी व्यवस्था निर्माण करणे हाच अनुरूप व समंजस मार्ग आहे. किंबहुना, समाजाची व अर्थव्यवस्थेची रचना व्यक्तिवादी असावी की समूहवादी असावी ही गोष्ट अमूर्त अशा बौद्धिक तत्त्वांनुसार ठरविण्याची गोष्टच नव्हे; एकेका परिसरात राहणारी माणसे किती विरळ वा दाट या स्थितीवर त्यासंबंधीचे निर्णय घेणे आवश्यक आहे. एका घरात दोनच माणसे असली तर जी व्यवस्था व्यवहार्य ठरेल तीच व्यवस्था त्या घरात वीस माणसे राहू लागल्यावर व्यवहार्य ठरणार नाही, आणि त्या घरातल्या माणसांची संख्या विसाची चाळीस झाल्यावर परत एक नवी व्यवस्था उभी करावी लागेल. हे केवळ व्यवहार्यतेच्या पातळीवर. मग सामाजिक उद्दिष्टे, नैतिक-आध्यात्मिक मूल्ये यानुसार पडणारे फरक वेगळेच.

भारतात बेकारी फार आहे, तेव्हा सर्वांना काम मिळेल अशा प्रकारची येथील उत्पादनतंत्र व पद्धती असल्या पाहिजेत,

या दृष्टीने ज्या तंत्रांमुळे व पद्धतींमध्ये मानवी श्रम अधिक प्रमाणात उपयोगात येतील ती तंत्रे व त्या पद्धती आपण वापराव्यात, या भूमिकेची चिकित्सा दांडेकर - रथ यांनी केली आहे. ही भूमिका व यातून सुचणारी उपाययोजना त्यांनी कुचकामी ठरविली आहे.

आपल्या प्रतिपादनात त्यांनी अंबर-खादी उत्पादन कार्यक्रमाची विशेष चिकित्सा केली आहे. चरख्यावर सूत कातणारा किंवा हातमागावर असे सूत विणणारा आपल्या श्रमांनी मूल्यवर्धन किती करतो, ते किती अल्प आहे, व त्याला वाजवी मजुरी द्यावयाची म्हटले तर सबसिडी कशी द्यावी लागते याचे विस्ताराने विवेचन केले आहे. या सर्व विवेचनात, आपल्या श्रमांनी श्रमिक जे मूल्यवर्धन करतो, जेवढे निर्माण करतो त्यापेक्षा जास्त मजुरी ज्यात द्यावी लागते असा मार्ग आपण अवलंबू नये असे त्यांच्या म्हणण्याचे सार आहे.

यात दोन प्रश्न गुंतलेले आहेत. कोणाच्या श्रमांनी किती मूल्य निर्माण होते हे ठरविण्याची रीत सयुक्तिक आहे काय? दुसरा प्रश्न, हा न्याय आपण सर्वांनाच लावावयास तयार आहोत काय?

दुसऱ्या प्रश्नाचा विचार आधी करू. प्लॅनिंग कमिशनच्या कार्याची जी चिकित्सा दांडेकर - रथांनी केली आहे ती लक्षात घेता या सर्व तज्ज्ञ मंडळींनी निर्माण केलेले मूल्य कवडीमोलाचे ठरते. हीच गोष्ट समाजातल्या कोणाकोणाबद्दल म्हणता येईल असा विचार केला तर बहुतेक अॅकेडेमिक संस्थांचा, संशोधन संस्थांचा, शाळा-कॉलेजांचा, सरकारी कचेऱ्यांचा यात समावेश करावा लागेल. याच मापाने मोजावयाचे ठरविले तर, उत्पादक श्रम करणाऱ्यांच्या जिवावर जगणाऱ्यांची संख्या भयानक मोठी आहे, आणि आपल्या देशातील श्रमिकांची गरिबी ही मोठ्या प्रमाणात या आयतोबांमुळे तीव्र झालेली आहे असे म्हणता येईल. आपला नियम लावून फक्त अंबर चरख्यावर सूत काढणाऱ्याचेच माप तेवढे दांडेकर - रथांनी काढावे ही क्रूर चेष्टा आहे.

कोण किती मूल्य निर्माण करतो हे, शेवटी, दांडेकर - रथ कसे ठरवतात? एखाद्याला हजार रुपये पगार मिळतो त्याअर्थी तो हजार रुपयांपेक्षा जास्त मूल्य आपल्या श्रमांनी निर्माण करतो असे म्हणायचे का? राष्ट्रपती असे कोणते मूल्य निर्माण करतो की त्याला मोठे वेतन, प्रचंड बंगला, हजारपाचशे नोकरचाकर इत्यादी मिळावेत? तर आपण असे म्हणू की, राष्ट्राचा मानबिंदू म्हणून तो असतो हे त्याचे मूल्य आपणास त्यासाठी एवढी जबर किंमत द्यावी एवढे अधिक वाटते. याचाच अर्थ असा की, मूलतः अमूक एका वस्तूची वा सेवेची अमूक इतकी किंमत ही गोष्ट तर्काधिष्ठित नसून 'मिथिकल' आहे; म्हणजे लोक तसे मानतात म्हणून तसे आहे. अमूक एक वस्तू दुर्मिळ आहे, अमूक एक कौशल्य दुर्मिळ आहे, तिचा पुरवठा कमी आहे, म्हणून अमूक एका वस्तूची वा कौशल्याची किंमत जास्त असे सांगितले जाते. ही दुर्मिळता, ही मागणी या गोष्टीदेखील समाजव्यवस्था, त्या समाजाने स्वीकारलेली उद्दिष्टे, मानलेल्या गोष्टी, इत्यादींवर अवलंबून असते. जणू काही या सर्वांच्या निरपेक्ष अशी काही मागणी असते, दुर्मिळता - विपुलता असते असे प्रतिपादन नेहमी केले जाते. पण हा एक आभास आहे. अमूक माणसाच्या श्रमाचे मूल्य किती ते ठरविणारे आपणच असतो. चार वर्षांपूर्वी कॉलेजमधील प्राध्यापकांना ३०० ते ६०० ग्रेड देणे 'योग्य' होते, आज ते 'अयोग्य' ठरून त्यांनाच

४०० ते ८०० (किंवा ७०० ते ११०० ) ही ग्रेड देणे 'योग्य' मानले गेले आहे. आता, प्राध्यापकांच्या कामातून एकाएकी जास्त मूल्य निर्माण व्हायला लागले काय? असे म्हणता येईल की, ते आधी जास्त मूल्य निर्माण करीत होते पण त्यांना त्याहून कमी वेतन मिळत होते, आता त्यांना योग्य ते मूल्य मिळू लागले आहे. हा निर्णय सर्वस्वी न्याय्य असेल, पण तो तेवढाच 'लहरी' आहे हे उघड आहे. उद्या आपण जर असे म्हटले की, आठ तास अंगमेहनत करणाऱ्यास ५ रुपये मिळावेत हे योग्य आहे तर ते तेवढेच समर्थनीय ठरेल.

आता आणखी एक मुद्दा राहतो. यंत्राच्या वापराने माणसाची उत्पादकता वाढते हा सर्वांना पुरेल इतके अन्न (वा कापड) समाजातील समजा, दहा लाख व्यक्ती (अर्थात अमूक एक यंत्रशक्तीची मदत घेऊन), निर्माण करू शकतात तर, एका अर्थी, समाजातील जास्त माणसे त्यासाठी गुंतविणे हा अपव्यय आहे. जास्त माणसे गुंतविल्याने नेहमीच भांडवल कमी लागते असे नाही असाही एक मुद्दा दांडेकर - रथ यांनी मांडला आहे. सर्व उदाहरणांच्या बाबतीत हे खरे असेलच असे नाही, दांडेकर - रथ यांनी अंबर-चरख्याचे उदाहरण तेवढे घेतले आहे व त्यातही आपण कोणकोणत्या खर्चांचा समावेश करतो हे स्पष्ट केलेले नाही. पण वादाकरिता हे त्यांचे म्हणणे सर्व उदाहरणांमध्ये खरे आहे असे आपण मानू. तर त्याचा तर्कशुद्ध निष्कर्ष असा निघेल की या देशात नवीन भांडवल गुंतवणूक जेथे जेथे करावयाची असेल तेथे तेथे ती फक्त उच्च उत्पादनक्षम अशा यंत्रसामग्रीतच करावी.

हा युक्तिवाद बिनतोडच वाटतो. जोवर माणसांच्या जीविताविषयी आपण संपूर्ण बेफिकीर असू, ‘श्रम’ या घटकामागे हाडामांसांची जिवंत माणसे आहेत ही गोष्ट विसरून आकडेमोड करून स्वस्त काय, महाग काय हे ठरवू तोपर्यंत हा युक्तिवाद बिनतोडच आहे. जमीन, भांडवल, यांसारख्या निर्जीव घटकांच्या जोडीला श्रमाचाही श्रम 'निर्जीव' मानून विचार करण्यात केवळ एक बौद्धिक सोय आहे. खरोखरच हाही इतर निर्जीव घटकांसारखाच एक घटक आहे असे धरून अर्थशास्त्रीय विवेचन चालते याचे कारण समजून घेण्यासारखे आहे. आजचा अर्थशास्त्रीय विचार विकास पावला, त्याने आकार घेतला त्या काळातील वरिष्ठवर्गीयांना अर्थव्यवस्थेच्या बाहेर फेकल्या जाणाऱ्या माणसांचे सोयरसुतक नव्हते. एकंदर सामाजिक-राजकीय जीवनातच जनतेला, एक साधन म्हणून वापरावयाचे व निकामी झाले म्हणजे टाकून द्यायचे एवढीच किंमत होती. मालकाला होणारा फायदा यालाच महत्त्व होते. या संदर्भात श्रमिकांचे जिवंत मानवी व्यक्तिमत्त्व आणि त्याचे श्रम यांची फारकत झाली असल्यास नवल नाही. समाजात राहणाऱ्या सर्व माणसांना काम देणे, किमान जीवनमान उपलब्ध करून देणे ही समाजाची जबाबदारी आहे हा विचार अमान्य असलेल्या, किंबहुना मनाच्या क्षितिजावरही नसलेल्या काळातले हे अमानुष अर्थशास्त्र आहे.

दिवसाचे आठ तास (किंवा सहा तास - जे काही मान आपण ठरवू ते) प्रामाणिक व चोख कष्ट करणाऱ्या व्यक्तीला वाजवी जीवनमान मिळावे हेच योग्य आहे. दिवसभर चरख्यावर सूत कातल्यावर त्याच्या श्रमाची किंमत पाचपन्नास पैशात करणारे अर्थशास्त्र गाढव आहे. आजचे अर्थशास्त्र व अर्थव्यवहारांची रचना गाढव असल्याचे अन्य पुरावे देता येतील. असे कितीएक दलालीचे प्रकार आहेत की त्यात अमूक एका खुर्चीत असणाऱ्या माणसाला त्याच्या त्या खुर्चीत असण्याच्या सुदैवामुळे खोऱ्याने पैसा ओढता येतो. किंवा असे म्हणा, आणि ते जास्त योग्य होईल, की एका विशिष्ट

मूल्य प्रणाली व उद्दिष्ट-समुच्च्यांशी निगडित असलेले हे अर्थशास्त्र व अर्थव्यवहार आहेत आणि त्यात सर्वांना काम देणे, जीवनमान उपलब्ध करून देणे, विषमतेला मर्यादित ठेवणे, इ. उद्दिष्टे व त्यामागची मूल्ये बसत नाहीत. ही उद्दिष्टे समोर ठेवून अर्थव्यवस्थेची पुनर्रचना करावयाची तर हे जुने अर्थशास्त्र निकामी आहे असे म्हणून प्रथम फेकून दिले पाहिजे. त्याच्या गुलामीतून स्वतःची मुक्तता केली पाहिजे.

भांडवल-सघन विरुद्ध श्रम-सघन हा विरोध खोटा आहे हे आपण दाखवून दिले या खुशीत श्रमसघन उत्पादनतंत्राचा पुरस्कार करणाऱ्यांचा मूळ मुद्दा दांडेकर - रथ विसरतात. ज्या गांधींनी टकळीचा व चरख्याचा पुरस्कार केला त्यांनीच एके ठिकाणी म्हटले आहे की सर्वांना प्रतिष्ठित रोजगार देण्याची व त्याद्वारा वाजवी जीवनमान उपलब्ध करून देण्याची अन्य काही योजना ज्या दिवशी यशस्वीपणे कार्यान्वित करता येईल त्या दिवशी चरखे जाळायला माझी हरकत नाही. आणि दांडेकर- रथ यांनाही, श्रमसघन उत्पादनतंत्रांच्या चर्चेच्या वेळी विसरलेला मुद्दा परत स्वीकारावा लागलाच आहे. रस्ते बांधणे, धरणे बांधणे, वृक्षारोपण करणे, इ. अकुशल स्वरूपाची कामे काढावीत, त्यासाठी मोठी, भांडवलसघन यंत्रसामग्री न वापरता छोटी अवजारे वापरावीत ही त्यांची उपाययोजना तरी वेगळ्या प्रकारची गांधीवादीच भूमिका नाही काय?

प्रत्येक सक्षम माणसास रोजगार मिळाला पाहिजे, तो त्याचा एक मूलभूत हक्क आहे, त्या रोजगारातून एक किमान जीवनमान त्याला उपलब्ध झाले पाहिजे, या भूमिकेच्या उपभूमिका कोणत्या, या नाण्याच्या दुसऱ्या बाजू कोणत्या याचा विचार दांडेकर - रथ यांनी केलेला नाही. कोणास आयते खायला मिळू नये, आणि कोणाच्या रोजगारावर गदा आणून कोणतीही 'सुधारणा' करता कामा नये, ती सुधारणाच नव्हे, या दोन्ही गोष्टी पहिल्या भूमिकेत अंतर्भूत आहेत. कारण प्रत्येक माणसास रोजगार व किमान जीवनमान उपलब्ध असावे हे म्हणणे ज्या मूल्यावर उभे आहे त्या मूल्यानुसार दुसऱ्या दोन गोष्टीही आपोआप येतातच. माणसामाणसांत भेद करणे चूक आहे, सर्व माणसे समान मौलिक आहेत हे त्यापाठीमागचे मूल्य आहे.

ही भूमिका घेतली म्हणजे आजच्यापेक्षा उद्या जास्त उत्पादन होणे म्हणजे समृद्धी ठरत नाही. उत्पादन कसे वाढते, ते वाढत असताना काय परिणाम होतात, ते उत्पादन कोणाच्या हाती जाते, इ. प्रश्नांना कोणती उत्तरे मिळतात त्यावर उत्पादनवाढ ही समृद्धीची खूण मानावयाची की नाही ते ठरते.

तात्पर्य, मूल्यवर्धन किती होते, कोणत्या यंत्रसामग्रीत व उत्पादनतंत्रात भांडवल गुंतविल्यास उत्पादन जास्त व स्वस्त होईल, यांसारख्या प्रश्नांची उत्तरे देण्याची आजची रीत आजच्या मूल्य व उद्दिष्ट चौकटीतच सयुक्तिक म्हणता येते. दांडेकर - रथ यांनी स्वीकारलेल्या मूल्य व उदिष्ट चौकटीत ती गैरलागू व घातक आहे.

या प्रकारच्या कार्यक्रमांमध्ये दरवर्षी ८०० ते १००० कोटी रुपये गुंतवल्यास देशातील ग्रामीण भागातील तळच्या ३० टक्क्यांपैकी पुरेशा लोकांना रोजगार देता येईल, आणि त्यामुळे इतरांच्या बेकारीचे निवारण आपसूक घडून येईल अशी आशा ते व्यक्त करतात, नव्हे हा परिणाम गृहीत धरतात.

इतरांचे वाभाडे काढताना तर्ककठोर बनणारे दांडेकर - रथ स्वतःच्या उपाययोजनेविषयी इतके निःशंक असावेत ही एक आश्चर्याची पण तेवढीच स्वाभाविक गोष्ट आहे. उदाहरणार्थ अंबर-खादी योजनेच्या चिंधड्या उडविताना सूत कातणारा प्रत्यक्षात किती कमी मूल्यवर्धन करतो त्याचे रसभरीत वर्णन त्यांनी केले आहे. पण देशव्यापी अकुशल श्रमाची कामे काढल्यावर त्या कामांवरील मजुरांची उत्पादकता मात्र त्यांनी ठरविलेले किमान वेतन देण्याइतकी सतत व सर्वत्र राहील असे मात्र ते गृहीत धरतात. म्हणजे खादीवाल्यांइतक्याच भोळसटपणे ते कागदी गणिते मांडतात व सोडवतात. मजुराची उत्पादकता गृहीत धरल्याने, त्याने अमूक इतके काम केले नाही तर काय करावयाचे याचा विचार करण्याचे अर्थातच त्यांना कारण पडत नाही. हीच कामे भांडवलसघन यंत्रसामग्री वापरून केली असता त्यांचा तौलनिक खर्च काय येईल याचेही गणित ते कोठे मांडीत नाहीत. अशा देशभर विखुरलेल्या कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्याकरिता जी यंत्रणा उभी करावी लागेल तीवर खर्च किती होईल, त्यात खाबूगिरीमुळे किती जादा खर्च होईल, त्या कार्यक्रमांतून निर्माण झालेल्या रस्त्यांचे धरणांचे चार पावसाळयांनंतर काय होईल, याचाही विचार ते करीत नाहीत. याचाच अर्थ असा की लोकांना काही एक रोजगार द्यावयाचा हा निर्णय आधी त्यांनी घेतला आहे. आणि शेवटी निर्णय असाच घ्यावा लागणार आहे. रोजगार दिल्यानंतर त्यातल्या त्यात जास्त फळ देणारे काम त्यापासून घ्यावे हा विचार योग्यच आहे.

दांडेकर - रथ यांच्या उपाययोजनेमधील दुसरी आश्चर्याची गोष्ट अशी की, ८०० कोट रुपये गुंतवून काही टक्के लोकांना काम दिले की गरिबी दूर करण्याचे, किमान जीवनमान उपलब्ध करून देण्याचे काम सर्व समाजाच्या बाबतीत होईल असे ते मानतात. या हिशेबातून शहरातील गरीब वगळले गेले आहेत हे लक्षात घेतले पाहिजे. त्याशिवाय ग्रामीण भागातील अगदी तळचे १० टक्के लोकही वगळले आहेत.* ८०० कोटींचा हिशेब हा असा काढला आहे : कॅलरीच्या दृष्टीने पुरेसा आहार मिळू शकेल इतके वार्षिक दर डोई खर्चाचे मान त्यांनी काढले आहे. या रेषेच्या खाली, अगदी तळचे १० टक्के सोडून त्यावरचे जे ३० टक्के आहेत त्यांचे आजचे सरासरी दर डोई वार्षिक खर्चाचे मान व वर उल्लेखिलेले किमान आवश्यक जीवन मान यांतील फरक त्यांनी काढला आहे. व मग त्यास ३० टक्के लोकसंख्येने गुणून किती उत्पन्न या ३० किती उत्पन्न या ३० टक्क्यांच्या पदरात पडले पाहिजे ते काढले आहे.

** याप्रकारे किती गरीब वगळले जातात ते पहा. शहरी भागात सुमारे ५० टक्के लोक गरीबीच्या परिस्थितीत राहतात असा अंदाज त्यांनी व्यक्त केला आहे. त्यानुसार शहरी गरीबांची संख्या सुमारे साडे- पाच कोटी होते. ग्रामीण भागात सुमारे ४२८ कोटी लोक राहतात. त्यापैकी १० % म्हणजे ४.२८ कोट झाले. म्हणजे सुमारे दहा कोटी लोक सरळच वगळले जातात!*

दुसऱ्या कोणी या पद्धतीने हिशेब करून मांडणी केली असती तर (रथ यांनी नाही तरी) दांडेकरांनी त्याची सालडी काढली असती. ग्रामीण भागातील या ३० टक्के लोकांचे दर डोई वार्षिक खर्चाचे मान इतके इतके आहे या अंदाजाची विश्वासार्हता प्रथम त्यांनी तपासली असती. आपल्या पहिल्या दोन प्रकरणांत ज्या ठाम आत्मविश्वासाने त्यांनी याविषयीच्या आकडेवारीचा वापर केला आहे तो असमर्थनीय आहे, कारण दुसऱ्याच प्रकरणात नॅशनल सँपल सर्व्हेची एक आकडेवारी त्यांनी चुटकीसरशी चुकीची ठरविली आहे. पण हा टीकेचा गौण मुद्दा झाला. ८०० कोटींचा कार्यक्रम

पार पडला की किमान जीवनमान गाठण्यास ज्याला जितकी जास्त उत्पन्नाची गरज आहे तेवढी तो अगदी अचूकपणे प्राप्त करून घेईल असे त्यांनी गृहीत धरले आहे ! ८०० कोटी खर्च केले तर त्यांचे वाटप खूप असमान होईल, कारण या कार्यक्रमांचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष लाभ जे घेऊ शकणार नाहीत असे गरीब वंचितच राहणार. एखाद्या कार्यक्रमाचा लाभ समाजातील एक गट घेऊ शकतो की नाही ही गोष्ट बऱ्याच गोष्टींवर अवलंबून असते. अमूक एका ठिकाणी काम काढले आणि त्या कामावर त्या भागातले सर्व गरीब व बेकार आले नाहीत तर ते ऐदी असल्याने, त्यांना अधिक उत्पन्न नको असल्याने आले नाहीत असे मानणे सोयीचे असले तरी योग्य नसते.

गरिबी दूर करावयाची म्हणजे बुद्धिवैभवाच्या जोरावर एखादे अवघड गणित कागदावर सोडवून दाखवायचे असा एकंदर समज दांडेकर - रथ यांचा असावा अशी पुस्तक वाचल्यावर जवळपास खात्री पटते. ८०० कोटीचा आकडा ते पृ. १२६ वर काही हिशेब मांडून काढतात व त्यांचे विवेचन पुढच्या १७-१८ पानांत संपतेच. जणू हा आकडा निवण्याचीच फक्त वाट होती. मजुरीच्या रूपात हे ८०० कोट रुपये गरीब व बेकारांच्या हाती, त्यांचे जीवनमान किमान पातळीपर्यंत वर येण्याच्या दृष्टीने आवश्यक त्या प्रमाणात प्रत्यक्षात हाती पडावयाचे तर, आजवरचा अनुभव लक्षात घेता, कोणकोणती पथ्ये पाळली पाहिजेत, ही कामे कशी विखुरली पाहिजेत, इ. बाबतीत या दोघांजवळ विचाराचा जवळपास संपूर्ण अभाव आहे. या दिवाळखोरीचा ढळढळीत पुरावा असा की, कंत्राटाने मजूर पुरविणाऱ्या कंत्राटदारांवर विसंबून गरिबी व बेकारी हटावचा कार्यक्रम हाती घेण्याची शिफारस ते करतात ! माकडाच्या हाती कोलीत देण्याचे हे धोरण आहे.

दांडेकर - रथ यांच्या विचारातला अपुरेपणा किती गंभीर आहे त्याचे आणखी एकच उदाहरण पुरे आहे. एक काम संपले की दुसरे काम की तिसरे अशी कामांची साखळी पुरी करीत ही गरीब बेकार मंडळी प्रकल्पापासून प्रकल्पापर्यंत बिऱ्हाड हलवीत राहणार. म्हणजे यांचे संसार यांच्या पाठीवर दीर्घ काळपर्यंत राहणार. आता जेथे काम चालू असेल तेथे हे राहणार कसे? यांच्या पोराबाळांची व्यवस्था काय? यांच्या औषधपाण्याची व्यवस्था काय? की त्यांना रोजी मिळाली की आपले कर्तव्य संपले असे मानावयाचे? असे आपण आज जवळपास मानतोच. याचे एक कारण असे की अशा कामांवर परंपरागत या प्रकाराची कामे करीत गावोगाव भटकणाऱ्या जमाती पुष्कळ प्रमाणात असत. त्यांच्या जीवनाचा हा घाट त्या लोकांनाही परिचित असा होता. तरीही त्यात अन्याय व अमानुषता होतीच. बाकीच्यांच्या बाबतीत अशी कामे तात्पुरती असत. दांडेकर - रथांच्या कल्पनेतील कार्यक्रम सुमारे १३ कोटी लोकांना गवसणी घालू पाहणारा आहे. यातील पुष्कळ मंडळी गरीब असली तरी भटक्यांचे जीवन हा त्यांच्या जीवनाचा घाट कधी नव्हता. आपण त्यांना असे म्हणतो आहोत की कदाचित तुमचे सर्व आयुष्य या प्रकारे जगण्यास तुम्ही तयार झाले पाहिजे. दुसऱ्या प्रकारे त्यांना रोजगार देता येत नाही तेव्हा त्यांनी ते जीवन पत्करावेही. पण मग त्यांच्या जीवनाला काही किमान सुभग असा घाट देण्याची जबाबदारी समाजाची नाही काय? की पोटाची खळगी भरण्यापलीकडे ज्यांना जीवन असण्याचे कारण नाही अशी ही मानवसदृश प्राणिजात समजून त्यांना वागवावयाचे? अशा प्रकल्पांच्या ठिकाणी तंत्रज्ञ व कॉंट्रॅक्टर यांशिवाय अनेकांच्या सेवांची व कौशल्यांची गरज पडेल. त्यांची व्यवस्था आपण कशी करणार आहोत?

सावकार, गुत्तेवाले, लुबाडणा रे व्यापारी, इतर समाजकंटक यांच्यापासून या लोकांचे संरक्षण करण्याचे काय? किंबहुना अमूक इतक्या कॅलरी मिळतील इतका आहार घेण्यासाठी खर्चाचे मान अमूक इतके असावे लागेल, यापलीकडे या लोकांच्या जीवनाविषयी काही अधिक विचार करावयास हवा याची पुसटशी जाणदेखील या उभयतांच्या विवेचनात आढळत नाही.

दारिद्र्य दूर करण्याचा वसा घेणे इतके सोपे नाही. वसा घ्यायचा तर त्यासाठी पुढील उद्गारांमध्ये गरिबांबद्दलचा जो अनादर दिसून येतो, थट्टा करण्याची वृत्ती दिसून येते, त्या दोन्हींच्या जागी शतकानुशतके मानवी प्रतिष्ठेपासून वंचित राहिलेल्या (आणि स्वत: च्या श्रमांनी आपल्यासारख्यांना मानवी प्रतिष्ठा प्राप्त करून देणाऱ्या) गरिबांविषयी कृतज्ञभाव अंगी बाणविण्याची, नम्र होण्याची प्रथम गरज आहे : Nevertheless, it is possible that some of the under-employed and hence underfed might choose employment offered. Their problem must wait to remain so rather than accept the type of until further sophistication can be innovated into the works programme in order to provide employment to their liking .' दुसरी गरज, दरिद्रीनारायणाची गरज ही केंद्रस्थानी राखून, तिथून ती काहीही झाले तरी ढळू द्यायची नाही असे ठरविले पाहिजे. वस्तू स्वस्त की महाग, तंत्र उच्च उत्पादनक्षम की अल्प उत्पादनक्षम इ. सर्व कसोटया गौण मानण्याची तयारी हवी. म्हणजेच आजच्या प्रचलित अर्थशास्त्राकडे जाणीवपूर्वक पाठ फिरविण्याची तयारी हवी. प्रत्येकाला कामाची हमी देण्याची भाषा दांडेकर - रथ करतात (पृ. ५७). पण एका हाताने दिलेले दुसऱ्या हाताने ते काढूनही घेतात. आम्ही देऊ त्या ठिकाणी, त्या शर्तीवर जे येतील त्यांनाच काम मिळेल अशी त्यांची योजना आहे. आपण जे काम, जेथे देऊ तेथे जाऊन ते काम स्वीकारणे त्या गरिबाला शक्य कोटीतले आहे हे पाहण्याची जबाबदारी जर हमी देणाऱ्याने घेतली नाही तर तशी हमी ही क्रूर फसवणूक ठरू शकते. गरीब हे केवळ आर्थिकदृष्ट्या गरीब नसतात. ते दुबळे, अपंग, रोगजर्जर असतात, व त्यांची ही दुखणी दीर्घकालीन असतात हे विसरून चालणार नाही. तेव्हा, नुसत्या हमीची भाषा पुरेशी नाही. प्रत्येकाला काम मिळण्याच्या आड जे जे येत असेल ते ते, ते प्रत्येकाला काम मिळण्याच्या आड येत आहे तोवर नाकारण्याची हिंमत व निग्रह असायला हवा. तिसरी गरज, समृद्धी कशात आहे, विकास कशाला म्हणायचे याचाही विचार आवश्यक ठरतो. किमान जीवनमानाचा विचार करताना गरिबांचे माणूसपण विसरणे सोयीस्कर असते. पण प्रारंभी सोय म्हणून, सोपे जावे म्हणून घेतलेल्या भूमिकेतून पडणारे वळण पुढे बदलणे कठीण होऊन बसते. मालक - गुलाम अशा व्यवस्थेतही सर्व गुलामांच्या पोटापाण्याची व्यवस्था पाहिली जाऊ शकते, आणि गुलाम कामे करतातच. म्हणून रोजगार हा कोणताही असला तरी चालेल अशी भूमिका घेऊनही चालत नाही. कोणचाच रोजगार नाही, टाचा घासत उपाशी मरावे लागत आहे अशा स्थितीबद्दल विचार करताना अशी भूमिका घेण्याकडे कल होतो. पण ते चूक आहे. म्हणून रोजगार निर्माण करताना त्या रोजगाराचे स्वरूप, त्यांची एकंदर रचना, त्यांतून पुष्टी पावणारी समाजव्यवस्था यांचाही विचार रोजगार निर्माण करतेवेळी करायला हवा.

माणसाला काम मिळाले पाहिजे, ते काम सामाजिक, नैतिक व व्यक्तिविकासदृष्ट्या प्रतिष्ठेचे असले पाहिजे व त्यापासून

व्यक्तीला मानवी जीवन जगता येईल इतके जीवनमान उपलब्ध झाले पाहिजे हा जर मध्यवर्ती आग्रह असला तर भारता- पुरती तरी दारिद्र्यनिवारण म्हणजेच एका नव्या धर्तीच्या समाजाची निर्मिती ठरेल. कारण समाजसंघटनेचे हे एक नवे व क्रांतिकारी तत्त्व आहे.

आपण ज्या तत्त्वाचा पुरस्कार करीत आहोत ते किती नवे व क्रांतिकारी आहे याची जाण दांडेकर - रथ यांना नाही. एरवी समाजाची व अर्थव्यवस्थेची आजची घडी बरीचशी आहे तशी कायम ठेवून हे साधता येईल असे विवेचन त्यांनी केले नसते. हे असे होते कारण लोकांचे दारिद्र्य हा अद्यापही त्यांच्या दृष्टीने एक बौद्धिक कसरतीचा विषय आहे, त्या गोष्टीला त्यांनी स्वतःला बांधून घेतलेले नाही. पण असे स्वतःला बांधून घेऊन ते विचार करतील तेव्हाच त्यांच्या विचाराला दारिद्र्य निवारणाचे हत्यार म्हणून परिणामकारक ठरण्याइतकी धार चढेल.

प्लॅनिंग कमिशन, राजकीय विचारप्रणालीला बांधलेली मंडळी, सरकारी चक्रात भरडून निघालेले खादी ग्रामोद्योगवाले, इत्यादिकांशी कुस्ती खेळून त्यांना चीतपट करणे जमले तर नवल नाही. भारतातील दारिद्र्य व बेकारी यांच्याशी (विचाराच्या पातळीवर) करावयाच्या कुस्तीची त्यातून सलामीपण झडत नाही. आणि, खरे आव्हान वर उल्लेखिलेल्या मंडळींचे नाही, ते प्रत्यक्ष दारिद्र्य व बेकारीचे आहे. 'पॉव्हर्टी इन इंडिया' या पुस्तकाच्या लेखनाने ते स्वीकारण्याचा आपला इरादा लेखकांनी जाहीर केला आहे एवढेच फार तर म्हणता येईल. संकल्प आणि पूर्तता यातले अंतर तुटण्याची अपेक्षा बाळगावी काय?